अधीक्षक अभियंता (स्थापत्य) या संवर्गातून मुख्य अभियंता (स्थापत्य) या संवर्गात पदोन्नती / पदस्थापना

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक बांधकाम विभाग

**शासन आदेश क्रमांकः पीओजी-१३२०/ प्र.क्र. १८१/ सेवा-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख : २८ फेब्रुवारी, २०२२

वाचा :- सा.बां. विभाग अधिसूचना क्रमांक : आरटीआर १०८३ / (५७३)(१)/ आस्था-१, दिनांक २०.६.१९८६

**शासन आदेश :-**

सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत अधीक्षक अभियंता (स्थापत्य) या संवर्गात कार्यरत श्री. रा. कृ. जवंजाळ यांना, संदर्भाधीन दिनांक २०.६.१९८६ च्या अधिसुचनेन्वये विहित केलेल्या सेवाप्रवेश नियमानुसार, मुख्य अभियंता (स्थापत्य) या पदावर (सुधारित वेतन मॅट्रीक्स एस-२९ : १३११००-२१६६००) (असुधारित वेतन संरचना पी.बी.-४ वेतन बँड रूपये ३७४००-६७००० ग्रेड वेतन ८९००/- या वेतनश्रेणीत) निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात रिक्त पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात येत असून पदोन्नतीउपरांत मुख्य अभियंता (स्थापत्य) संवर्गातील त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे.

| अ. क्र. | ज्येष्ठता क्रमांक व दिनांक | अधिकाऱ्याचे नाव व प्रवर्ग | सध्या कार्यरत ठिकाण | पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|
| १ | ९<br>१५.४.२०२१ | श्री. राजेंद्र कृ. जवंजाळ, (इ.मा.व.) | अधीक्षक अभियंता व उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालीय, मुंबई | मुख्य अभियंता, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ मर्या., मुंबई |

अधीक्षक अभियंता **तथा उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई** या पदावर अन्य अधिकाऱ्याची पदस्थापना स्वतंत्रपणे करण्यात येईल.

२. श्री. रा. कृ. जवंजाळ, अधीक्षक अभियंता (स्थापत्य) यांची सदर पदोन्नती ही पुढे नमूद केलेल्या बाबींच्या अधीन राहून करण्यात येत आहे :

i. सदर पदोन्नती ही मा. सर्वोच्च न्यायालयातील विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २८३०६/२०१७ मधील अंतिम निर्णयास अधीन राहून तसेच रिट पिटीशन स्टँप नं. १०८७६/२०२१ व रिट पिटीशन स्टँप नं. १०८७८/२०२१ मध्ये मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी दि. २५.५.२०२१ रोजी दिलेल्या निर्णयानुसार सदर पदोन्नती नमूद रिट याचिकेत होणाऱ्या निर्णयाच्या अधीन राहील.

ii. सदर पदोन्नती ही निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने पदोन्नतीच्या परिणामी त्यांना नियमितपणाचा व सेवाज्येष्ठतेचा कोणताही हक्क राहणार नाही.

३. श्री. जवंजाळ यांना देण्यात आलेली सदर पदोन्नती ही कोणतीही पूर्वसूचना किंवा नोटीस न देता रद्द करण्याचा अधिकार शासन राखून ठेवत आहे.

४. संबधित नियंत्रक अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी श्री. जवंजाळ यांना पदोन्नतीउपरांत पदस्थापनेच्या ठिकाणी रूजू होता यावे म्हणून आवश्यक ती स्थानिक पर्यायी व्यवस्था करून पदमुक्त करावे व नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर होण्यास सांगावे. तसेच, श्री. जवंजाळ यांना पदोन्नतीउपरांत पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते पदस्थापनेच्या ठिकाणी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास doser1.pwd@maharashtra.gov.in या ई-मेल आयडीवर त्वरित अवगत करावे.

५. श्री. जवंजाळ यांनी तात्काळ नव्या पदाचा पदभार स्वीकारावा व आपला पदग्रहण अहवाल शासनास विनाविलंब सादर करावा.

६. श्री. जवंजाळ यांनी पदोन्नतीच्या पदावर पदग्रहण केल्यापासून एक महिन्याच्या आत वेतन निश्चितीचा विकल्प द्यावा. असा विकल्प विहित मुदतीत न दिल्यास त्यांची वेतननिश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम क्र. ११ (१) (ए) अनुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेवून करण्यात येईल.

७. श्री. जवंजाळ यांना प्रतिनियुक्तीच्या पदांवर नियुक्ती / पदस्थापना देण्यात आली आहे. सदर नियुक्ती ही महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ च्या परिशिष्ट दोन मध्ये विहित केलेल्या प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्तीच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

८. श्री. जवंजाळ यांनी पदोन्नतीने पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास तसेच संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, पुणे यांना कळवावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२२८११५१०३७९१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Gangadhar Mahajan Gaikwad

Digitally signed by Gangadhar Mahajan Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0d38ef6405f5cae15731340f134ce56f50e939ba034b962c317c33ce102270d0, serialNumber=5eeead19a0ef3d2434afccb36079e80e7ede5a45017ec3297470e90ae602404b, cn=Gangadhar Mahajan Gaikwad
Date: 2022.02.28 15:24:28 +05'30'

**(गं. म. गायकवाड)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ मर्या., मुंबई
३. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई / कोकण / पुणे / नाशिक / औरंगाबाद / नांदेड/अमरावती/ नागपूर/ राष्ट्रीय महामार्ग विभाग, नवी मुंबई,
४. मुख्य अभियंता (विद्युत), मुंबई,
५. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
६. संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप पुणे
७. श्री. राजेंद्र कृ. जवंजाळ, अधीक्षक अभियंता तथा उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
८. संचालक, उपवने व उद्याने, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई,

१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
११. सामान्य प्रशासन विभाग, का.-१३/१६-ब, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२. मा. मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१३. मा. मंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई,
१४. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१५. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई,
१६. अपर मुख्य सचिव (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,
१७. सचिव ( रस्ते / बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,
१८. सर्व सह सचिव / उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१९. कार्यासन आस्था-१ /२ /३, प्रशा-२, सेवा-६, रोख शाखा, संगणक कक्ष, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
२०. निवडनस्ती.